मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) द्वारे निर्मित ६० सेकंदांचे चलचित्र सिनेमागृहात प्रदर्शित करण्यापोटी अनुज्ञेय जाहिरात करातून माफी देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी२०१४/प्र.क्र.१९६/टी-१**
३२ वा मजला, जागतिक व्यापार केंद्र, सेन्टर १,
कफ परेड, मुंबई - ४०० ००५
तारीख: १४ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) द्वारे मुंबई महानगर क्षेत्रात सुरक्षित व जलद प्रवासाच्या दृष्टीने उपलब्ध करुन दिलेल्या परिवाहनाच्या सोयी, उदा. ईस्टर्न फ्री वे, वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर मेट्रो कॉरीडोर, मोनोरेल या महत्वाकांक्षी प्रकल्पाबाबत माहिती देण्याकरिता साठ सेकंदांचे एक चलचित्र (Short Film) तयार करण्यात आले आहे. सदर चलचित्र मुंबई महानगर क्षेत्रातील सर्व जिल्ह्यांमधील एकपडदा चित्रपटगृह व बहुविध चित्रपटगृहांमध्ये दाखविण्याकरिता महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ३ अन्वये करमणूक शुल्क अनुज्ञेय होत नाही. तथापि, महाराष्ट्र जाहिरात कर १९६७ अनुसार चित्रपटगृहामध्ये दाखविल्या जाणाऱ्या जाहिरातींवर या अधिनियमाच्या कलम ३ नुसार जाहिरात देणाऱ्या संस्थेने अदा करावयाच्या एकूण रकमेच्या ५०% या प्रमाणात जाहिरात कर अनुज्ञेय होतो.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र जाहिरात कर १९६७ मधील कलम ९(३) नुसार तसेच कलम ९(१)(a) नुसार सिनेमागृहात प्रदर्शित होणारी जाहिरात राज्यशासनाकरिता करण्यात येत असल्यास, अनुज्ञेय होणाऱ्या जाहिरात करातून सवलत देण्याचे अधिकार राज्यशासनास आहेत. या अधिकारांचा वापर करुन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) द्वारे निर्मित ६० सेकंदांचे

चलचित्र (short Film) मुंबई महानगर क्षेत्रातील सर्व जिल्ह्यांमधील एकपडदा चित्रपटगृह व बहुविध चित्रपटगृहामध्ये दि. ११ ऑगस्ट, २०१४ पासून दि. २८ ऑगस्ट, २०१४ या कालावधीमध्ये दाखविण्याकरिता अनुज्ञेय होणाऱ्या जाहिरात कराच्या संपूर्ण रकमेस माफी अनुज्ञेय करण्यात येत आहे.

- ❖ जाहिरात करातून माफीपोटी जिल्हाधिकारी कार्यालयाने या कार्यक्रमापोटी होणाऱ्या हानीची रक्कम परिगणित करुन त्याची माहिती विभागास द्यावी.
- ❖ विनिर्दिष्टित केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही करमणूकीच्या कार्यक्रमाबाबत या आदेशाचा वापर केला जाणार नाही. या आदेशात कोणत्याही प्रकारची दुरुस्ती फेरबदल करण्यात येणार नाही.
- ❖ संदर्भाधिन शासन निर्णयामध्ये नमूद उर्वरित सर्व अटी व शर्ती तशाच्या तशा अस्तित्वात राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१६५२१२२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.14 17:31:04 +05'30'

**विद्या रा. हम्पय्या**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA), बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा पूर्व, मुंबई - ५१

२. विभागीय आयुक्त, कोकण
३. प्रधान सचिव (वित्त)
४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
५. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर
६. जिल्हाधिकारी, ठाणे
७. जिल्हाधिकारी, रायगड
८. जिल्हाधिकारी, पालघर
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
११. निवड नस्ती